वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, मांजरी (बु.) ता.हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता संशोधनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१९/प्र.क्र.३४/२५स**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०५.०२.२०१९

वाचा -

१) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.३१९०/अ-७३/३-स,दि.४/१/१९९२.
२) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र.३१९१/४८३४१/प्र.क्र.२४१/३-स, दिनांक : २४/२/१९९२.
३) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ३१९०/३८९२७/प्र.क्र.३७३/३-स, दिनांक : १३/३/१९९२.
४) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००९/१३७१/प्र.क्र.१२/२५स दिनांक १७/६/२०००.
५) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००८/प्र.क्र. ५८/२५ स दिनांक १२/३/२००८
६) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००९/प्र.क्र.१३७१/प्र.क्र.१२/२५स दिनांक १७/६/२००९.
७) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका१००९/प्र.क्र.१२६/ २५-स, दिनांक १८/८/२००९.
८) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. साआ /अर्थ ३/कक्ष-६/ व्ही.एस.आय./२६४७/अनु/२०१८, दिनांक ०४/०९/२०१८ .
९) शासन निर्णय क्र.ससाका २०१८/प्र.क्र.१४०/२५ स, दि.२४.०९.२०१८.
१०) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.२५.०१.२०१९.

प्रस्तावना -

ऊस खरेदी कराच्या वाढीव महसूलातून साखर उद्योगाच्या मुलभूत सुविधासाठी तरतुद करण्याकरीता वर उल्लेख केलेल्या क्रमांक -१ येथील शासन निर्णय दिनांक ४.१.१९९२ अन्वये (१) "सहकारी साखर कारखाना (मूलभूत सुविधा विकास आणि परिक्षण) निधी" व (२) "साखर संशोधन (महाराष्ट्र राज्यांतर्गत निधी)" असे दोन निधी निर्माण करण्यात आलेले होते. तथापि, शासन निर्णय क्रमांक ससाका -१००८/प्र.क्र.५८/२५ सी दिनांक १२/०३/२००८ अन्वये सदरहू निधी रद्द करण्यात आला असून सदरहू प्रयोजनासाठी लागणारा आवश्यक निधी यापुढे अर्थसंकल्पिय तरतूदीतून उपलब्ध करुन देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. तसेच वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट मांजरी (बु.) ता.हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस आर्थिक वर्ष २००९-१० पासून दरवर्षी संशोधन सहाय्याची तरतूद किमान रु.५.०० कोटी तसेच गाळप ५०० लाख मेट्रीक टनापेक्षा जास्त झाल्यास या

तरतूदीतून त्यावरील गाळपावर प्रतिटन रु.१/ वाढ करण्याबाबत दि.१७ जून, २००९ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. गाळप हंगाम २०१७-१८ मध्ये राज्यात एकूण ९५२.४७ लाख मे.टन इतके ऊसाचे गाळप झाले आहे. शासन निर्णय दि.१७.०६.२००९ मधील तरतूदीनुसार त्यानुसार वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, जि. पुणे या संस्थेस किमान रुपये ५,००,००,०००/- इतके अनुदान देय आहे. वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील तरतूदीनुसार ७० % तरतूद रु.३,५०,००,०००/- (रुपये तीन कोटी पन्नास लाख फक्त) दि.२४.९.२०१८ च्या शासन निर्णयानुसार वितरीत करण्यास मंजूरी दिलेली आहे. आता, वित्त विभागाच्या दि.२५.०१.२०१९ च्या परिपत्रकातील तरतूदीनुसार सदर संस्थेस देय असलेल्या अनुदानापैकी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ९०% म्हणजेच उर्वरित २०% रक्कम रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान यासाठी सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतुदीपैकी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस वित्त विभागाच्या दि.२५.०१.२०१९ च्या परिपत्रकातील प्राधिकारानुसार देय असलेल्या अनुदानापैकी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ९० % म्हणजेच उर्वरित २०% रक्कम रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन याव्दारे मंजूरी देत आहे. सदरहू निधीचा वापर करताना शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक ससाका- १००९/प्र.क्र.२६/२५ स, दिनांक १८ ऑगस्ट, २००९ अन्वये विहित करण्यात आलेल्या नियम व अटीचे पालन करणे बंधनकारक आहे. तसेच सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सदर अनुदानाचा संपुर्ण विनियोग केल्यानंतर सनदी लेखा परिक्षकाकडून प्रमाणित करुन हे वित्तीय वर्ष संपल्यानंतर परंतु, पुढील वितरणा पूर्वी सादर करावे.

२. रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त ) इतकी रक्कम **"मागणी क्रमांक-व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहाय्य-(०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा. सदर खर्च सन २०१८-१९ साठी मंजूर झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी बु., ता. हवेली, जिल्हा - पुणे (VASANTDADA SUGAR INSTITUTE, MANJARI (BK.) TALUKA - HAVELI, DISTRICT-PUNE) या संस्थेस अनुदान म्हणून मंजूर केलेली रक्कम रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त) जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे यांचे कार्यालयामार्फत त्या संस्थेला वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५.०१.२०१९ मधील नमूद अटींची पूर्तता झाली आहे. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५.०१.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास मिळालेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०५१२५१२७१२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2019.02.05 13:28:50 +05'30'

**( प्रमोद वळंज )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१२, (अर्थोपाय शाखा)
१२) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.),ता. हवेली, जिल्हा - पुणे.
१३) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१४) सहसंचालक, लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती ( २५-स)